**<u>ॲड. श्री. राजा ठाकरे यांची विशेष समुपदेशी म्हणून आणि त्यांना साहय्य करण्यासाठी ॲड. श्री.महेश मुळे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत....</u>**

**साकीनाका पोलीस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र.९३७/२०२१ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्याय प्रकरणी मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कामकाजाकरीता.**

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०९२१/प्र.क्र.२१२/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०७ मार्च, २०२२

<u>संदर्भ:-</u> १.शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग, क्र.एसपीपी-२०२१/यू.ओ.आर.६४/डी-१४, दि. २०.०९.२०२१

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. २९/७/२०१५.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. १६/६/२०१७.

**शासन निर्णय :-**

साकीनाका पोलीस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र.९३७/२०२१ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्याय प्रकरणी मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी ॲड. श्री. राजा ठाकरे यांची विशेष समुपदेशी म्हणून आणि त्यांना साहय्य करण्यासाठी ॲड. श्री.महेश मुळे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून विधि व न्याय विभाग विभाग, अधिसूचना दि. २०/०९/२०२१ अन्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे.

मा. न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने हाताळण्यासाठी ॲड. श्री. राजा ठाकरे यांना खालील प्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी-रु. १,००,०००/-(रुपये एक लाख फक्त)

ब) विचारविनिमय फी / प्रतितास / तासाचा भाग - रु. २५,०००/- (रुपये पंचवीस हजार फक्त) (कमाल मर्यादेशिवाय)

मा. न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने हाताळण्यासाठी ॲड. श्री श्री.महेश मुळे यांना खालील प्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी-रु. २५,०००/-( रुपये पंचवीस हजार फक्त)

ब) विचारविनिमय फी/ प्रति बैठक - रु. ५,०००/- (रुपये पाच हजार फक्त)

तसेच सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. श्री. राजा ठाकरे व ॲड. श्री.महेश मुळे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता व्यावसायिक फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य पोलीस मुख्यालय (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार तसेच संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२२०३०७१७०५३९५७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2022.03.07 17:08:46 +05'30'

**( तुषार दि. राठोड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) पोलीस सह आयुक्त (का. व सु.), मुंबई.
३) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, साकीनाका पोलीस ठाणे, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र राज्य.
५) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) ॲड. श्री. राजा ठाकरे, ३०१, मारुती मॅनशन १७, रघुनाथ दादाजी स्ट्रिट, फोर्ट, मुंबई- ४०० ००१.

८) ॲड. महेश मुळे, ऑफिस नं-८, मॉडर्न हाऊस, २रा माळा, डॉ.व्हि.बी.गांधी मार्ग, फोर्ट, मुंबई- ४००००१

९) कार्यासन अधिकारी (का-१४)/अ' शाखा, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती (पोल-१०).